मौ. घुलेवाडी, ता. संगमनेर जि. अहमदनगर या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु- २०१६/प्र.क्र. १२१/पापु ०९**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मुंबई-४०० ०३२**
**तारीख: १० जानेवारी, २०१७**

वाचा -

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापापु २०१२/प्र.क्र.१०८/पापु ०९ दि. ७.११.२०१२ चे प्रशासकीय मान्यता आदेश.
२) मुख्य अभियंता(प्र), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे तांत्रिक मंजूरी आदेश क्र. तांशा २/सुधा.तां.मा/२३४३/२०१६, दि. ३१.१२.२०१६
३) मुख्य अभियंता (प्र),महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.मुअ/नाशिक/तांशा २/१७५४/२०१६ , दि. २७/९/२०१६.
४) मुख्य अभियंता (प्र),महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र मुअ/नाशिक/तांशा २/२३४४/२०१६ , दि.३१.१२.२०१६

## प्रस्तावना

घुलेवाडी ता. संगमनेर जि. अहमदनगर नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु. १८१८.६३ /- लक्ष (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. तथापि सदर योजनेच्या कामाच्या जादा दराच्या निविदा मंजूरी व इतर कारणांमुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली आहे. मुख्य अभियंता(प्र), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रादेशिक विभाग, नाशिक यांच्या संदर्भ क्र.२ येथील आदेशान्वये प्रस्तुत योजनेच्या **रु. २०,९०,८८,७२२ /-(ढोबळ)** किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत तांत्रिक मान्यता देण्यात आली आहे. परिणामी, मुख्य अभियंता(प्र), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रादेशिक विभाग, नाशिक, यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.३ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

घुलेवाडी ता.संगमनेर जि. अहमदनगर या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु. २०,९०,८८,७२२ /-(ढोबळ) (अक्षरी रुपये वीस कोटी नव्वद लक्ष अठठयांऐंशी हजार सातशे बावीस फक्त)** एवढ्या सुधारीत किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

## अटी

१. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

२. उपरोक्त नमुद सुधारीत किंमतीत उर्वरित सर्व कामे ६ महिन्यात पूर्ण करावीत.

३. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४. सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, अहमदनगर यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत / जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतीच्या अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

५. सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

६. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

७. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायतीची/जिल्हा परिषदेची यांची राहील.

८. हागणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

९. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील.

२. या योजनेच्या सुधारीत किंमतीतील वाढीव खर्च **रु. २,७२,२६,१९५ /- (अक्षरी रुपये दोन कोटी बहात्तर लक्ष सव्वीस हजार एकशे पंचान्नव फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११०१७०३२२९९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaishali Dattatraya Fulsundar

Digitally signed by Vaishali Dattatraya Fulsundar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=035ad3ac42b3cb2d7153eb07ca4987f4c28aa8b52bad8a330512fc5df5d5b426, cn=Vaishali Dattatraya Fulsundar
Date: 2017.01.10 17:08:19 +05'30'

**( वै.द.फुलसुंदर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
३) सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य
४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई
६) जिल्हाधिकारी, अहमदनगर
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
८) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रादेशिक विभाग, नाशिक
९) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
१०) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
११) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१२) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अहमदनगर
१३) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, संगमनेर,अहमदनगर.
१४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अहमदनगर.
१५) कक्ष अधिकारी (कार्या १४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) कक्ष अधिकारी (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) कार्यासने (पापु-०४, १० व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१८) निवडनस्ती कार्यासन पापु-०९.